शासकीय वैद्यकीय महाविद्यालय रुग्णालय, नागपूर या संस्थेच्या नवीन / स्वतंत्र परिचर्या महाविद्यालय इमारत बांधकाम अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : जीसीएन-२०२३/प्र.क्र.१५३/प्रशा-१,
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१.
दिनांक : २४ ऑगस्ट, २०२३

वाचा :
१) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्रमांक : संवैशिवसं/ शावैमना /नवीनस्तंत्रपरिचर्याइमा/१९०/आय-प/२२, दिनांक १९.०१.२०२३
२) कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, पत्र क्र.बैठक-२०२३/प्र.क्र.३०/ इमा-१, दिनांक १३.०७.२०२३

शासन निर्णय :

विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेतील इमारतीमध्ये सद्यस्थितीत विद्यार्थी प्रवेश क्षमता भविष्यात वाढविणे आवश्यक असून जी.एन.एम.नंतर दोन वर्षाचा पी.बी.(पोस्ट बेसिक) अभ्यासक्रम संस्थेत सुरु करणे तसेच संस्थेतंर्गत नर्सिंग विषयाचे ११ विशिष्ट अभ्यासक्रम सुरु करणेकरीता परिचर्या महाविद्यालयाची नवीन इमारत बांधकाम करणे आवश्यक आहे. सदर बांधकामासाठी मा.उच्चस्तरीय सचिव समितीने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने रुपये ५०,६५,७१,८५३/- (रुपये पन्नास कोटी, पासष्ट लक्ष, एक्क्याहत्तर हजार, आठशे त्रेपन्न फक्त) इतक्या रक्कमेच्या बांधकाम अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अदांजित किंमत |
|---|---|---|
| १ | Construction of Nursing College Building at Government Medical College and Hospital, Nagpur | ५०,६५,७१,५८३ |

अटी :-

१) सदर काम करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबत पुर्तता करण्यात यावी.

२) प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

३) तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक - २०१७/प्र.क्र११/नियोजन-३,दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरीता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दिनांक २४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

७) इमारतीमध्ये दिव्यांगाकरीता उपलब्ध करुन द्यावयाच्या विविध सोयीबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

८) विषयांकित कामाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, यादृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. प्रस्तुत बांधकामासाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षात मंजूर होणा-या निधीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एच-०८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन
१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

३. सदर शासन निर्णय, मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ११.०७.२०२३ रोजी आयोजित उच्चाधिकार समितीच्या बैठकीत प्राप्त सहमती व त्यानुषंगाने प्राप्त इतिवृत्तानुसार तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-१, उप विभाग-५, अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ (१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८२४१७५०२९४६१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b8240 6eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8 EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF111 1D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2023.08.25 12:00:02 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
२. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
३. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
७. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर
९. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर
१०.अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर.
११.जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
१२.निवडनस्ती (प्रशा-१).